प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, टिटवे, ता.दिंडोरी, जि.नाशिक येथील इमारत / वसतिगृहाच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.१४२/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :-** आयुक्त, आ.वि.,नाशिक यांचे पत्र क्र.इमा-०९/प्र.क्र.०७/का/८(३), दि.३०.१.२०१०.

**शासन निर्णय :** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, टिटवे, ता.दिंडोरी, जि.नाशिक येथील वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांच्या निवासस्थानाची दुरुस्ती, इमारत व पाण्याच्या टाकीची दुरुस्ती व मुलींच्या वसतिगृहाची दुरुस्तीच्या रु.१९,९४,९३०/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१, दिंडोरी यांनी तपासली आहेत. तसेच प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक, मुख्याध्यापक, शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, टिटवे, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१, दिंडोरी व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (उत्तर), नाशिक यांनी साक्षांकित केली आहेत.

३. सदर अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर कामे दुरुस्तीची असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या ठिकाणी खाली नमूद केलेल्या कामांच्या अंदाजपत्रकास १५% सेंटेज चार्जेस वगळून खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | बाब | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|
| १ | वर्ग-३ कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती | रु.४,३४,१००/- |
| २ | वर्ग-४ कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती | रु.४,३३,०००/- |
| ३ | शाळा इमारत व पाण्याची टाकी दुरुस्ती | रु.४,३३,४१५/- |
| ४ | मुलींच्या वसतिगृहाची दुरुस्ती. | रु.४,३४,२००/- |
| | **एकूण** | **रु.१७,२३,७१५/-** |

G:\R\TD\16.wp

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओग्राफी करुन त्याची सी.डी. शासनास सादर करावी.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००३०३१६३२०८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.१, दिंडोरी.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.